शासन सेवेतील गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करणेबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस-१३१५/प्र.क्र.२३७/पोल-४,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक :- ३० मे, २०१५.**

**संदर्भ :**

१) मा. सर्वोच्च न्यायलयाने रिट पिटीशन (सिव्हिल) क्र.८२/२०११ मध्ये दि. ३१.१०.२०१३ रोजी दिलेला निर्णय.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.३१.१.२०१४ व दि.२०.५.२०१४ व दि.१९.१.२०१५

**प्रस्तावना**

मा. सर्वोच्च न्यायलयाने संदर्भ क्र. १ येथील निर्णयानुसार दिलेल्या निर्देशाचे पालन करण्यासाठी शासन सेवेतील गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याचे आदेश सामान्य प्रशासन विभागाने दि.३१.१.२०१४ रोजी निर्गमीत केले आहेत. या शासन निर्णयाला संदर्भाधीन दि.२०.५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिलेली स्थगिती त्या विभागाने संदर्भाधीन दि.१९.१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये उठविली आहे. त्यानुषंगाने न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

## शासन निर्णय

दि.३१.१.२०१५ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद २ (अ) मधील तरतुदीनुसार न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी पुढीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव (गृह) | : अध्यक्ष |
| २. | महासंचालक (न्यायीक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई. | : सदस्य |
| ३. | प्रधान सचिव(विशेष) | : सदस्य |
| ४. | सहसचिव/उपसचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग | : सदस्य |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५३०१३०८५५५०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Surendra Ambadas Deshmukh

Digitally signed by Surendra Ambadas Deshmukh
DN: CN = Surendra Ambadas Deshmukh, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.30 13:09:53 +05'30'

**(सु.अं.देशमुख)**
**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई

२) महासंचालक (न्यायीक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) प्रधान सचिव (विशेष), मंत्रालय, मुंबई

४) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, पुणे/नाशिक/ औरंगाबाद/ नागपूर/

६) अमरावती/कोल्हापूर/नांदेड.

७) सहसचिव (सेवा/साप्रवि), मंत्रालय, मुंबई.

८) निवड नस्ती/ गृहविभाग (पोल-४)